**गोबरधन कार्यक्रमांतर्गत जिल्हास्तरीय समितीची स्थापना करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** स्वभामि २०१८/प्र.क्र.३६७/पापु-१६
७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १९ सप्टेंबर,२०१८.

**वाचा :-**

**१) केंद्र शासनाच्या पेयजल व स्वच्छता मंत्रालयाच्या मार्गदर्शक सूचना एप्रिल, २०१८.**
**२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक २८ ऑगस्ट, २०१८.**

**प्रस्तावना :-**

उपरोक्त वाचा क्रमांक १ अन्वये केंद्र शासनाच्या पेयजल व स्वच्छता मंत्रालयाने गोबरधन कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने सर्वसाधारण सूचना निर्गमित केल्या आहेत. गोबरधन कार्यक्रमाची यशस्वीरित्या प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती (State Technical Advisory Committee-STAC) गठीत करण्यातसंदर्भात, मार्गदर्शक सूचना मधील Role of State अन्वये निर्देशित केले आहे. त्यास अनुसरून महाराष्ट्र राज्यामध्ये गोबरधन कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्यासाठी, ग्रामपंचायतीने राबवावयाच्या प्रस्तावांना सहाय्य करण्यासाठी तांत्रिक यंत्रणेची (Technical Agency) निवड करणे, तांत्रिक यंत्रणेने (Technical Agency) तयार केलेल्या व सादर केलेल्या प्रस्तावांना मान्यता देणे या व इतर बाबींकरिता वाचा क्रमांक २ अन्वये राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती (State Technical Advisory Committee-STAC) गठीत करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील शेवटच्या परिच्छेदात जिल्हा पाणी व स्वच्छता कक्षाची भूमिका येथे गोबरधन कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हा पाणी व स्वच्छता कक्षाने (DWSC) संबंधित जिल्हयांच्या प्रस्तावांना मान्यता देणे व संनियंत्रण करणे यासाठी समन्वय समितीने Nodal Agency म्हणून काम करावयाचे आहे, असे नमूद केले आहे. त्याऐवजी गोबरधन कार्यक्रमातंर्गत स्वतंत्र जिल्हास्तरीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्यामध्ये गोबरधन कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्यासाठी खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे:-

| क्र. | अधिकारी पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २ | पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३ | कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ४ | कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा,जिल्हा परिषद | सदस्य |
| ५ | अभियांत्रिकी तज्ञ, जिल्हा परिषद | सदस्य |

| क्र. | अधिकारी पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| ६ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता,जिल्हा परिषद | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :-**

गोबरधन कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे अध्यक्षतेखालील उपरोक्त जिल्हास्तरीय समितीने संबंधित जिल्हयांच्या प्रस्तावांना मान्यता देणे व संनियंत्रण करणे यासाठी समन्वय समिती Nodal Agency म्हणून काम करावयाचे आहे.

जिल्हयांच्या प्रस्तावांना मान्यता देताना पुढील बाबींची तपासणी करण्यात यावी. :- १) प्रस्ताव मंजूरीबाबत ग्राम सभेच्या ठराव आवश्यक आहे. २) गोबरधन कार्यक्रमांच्या अंमलबजावणीसाठी ग्रामपंचायतीने जागा उपलब्धतेबाबत संमतीपत्र देणे आवश्यक आहे. ३) प्रस्ताव केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार विहित नमुन्यात सादर केलेला असावा. ४) केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे अनुज्ञेय असलेल्या कमाल रक्कमेपेक्षा अधिकचा खर्च संबंधित ग्रामपंचायत करणार असल्याबाबत ग्राम पंचायतीचे संमतीपत्र घेणे आवश्यक आहे. ५) प्रस्तावाची तपासणी करताना आवश्यकतेनुसार संबंधित ग्रामपंचायतीचे ग्रामसेवक, गटविकास अधिकारी यांना बैठकांसाठी निमंत्रित करण्यात यावे.

**समितीची मुदत:-**

उपरोक्त समिती दोन वर्षाकरीता कार्यरत राहील. यासंदर्भातील खर्च स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) या योजनेंतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१९१५२६२२६३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Chandrakant Krishna More

Digitally signed by Chandrakant Krishna More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea4271090267228122b638d6f2cdedad62, serialNumber=2314cf333e070f9936792bc95890fa89b2f617a931b2b577b703fa858f3df433, cn=Chandrakant Krishna More
Date: 2018.09.19 16:39:27 +05'30'

**(चं. कृ. मोरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, महाराष्ट्र शासन, मुंबई.
३. सचिव, पशुसंवर्धन व दुग्ध विकास विभाग, मंत्रालय, महाराष्ट्र शासन, मुंबई.

४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई.

५. उप सचिव तथा प्रकल्प अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय मुंबई.

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).

७. संचालक, मित्रा, नाशिक.

८. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर नवी मुंबई.

९. संचालक, भाभा ऑटोमीक रिसर्च सेंटर, मुंबई.

१०.गोपुरी आश्रम,मु.पो.वागदे,गोपूरी,ता.कणकवली,जिल्हा सिंधुदुर्ग.

११.अवर सचिव पापु-२५, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर नवी मुंबई.

१२.संग्रहार्थ.